लघु पाटबंधारे तलाव कांग ता. जामनेर , जि. जळगाव, या योजनेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१७/(२२६/२०१७) लपा

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: २१ जून, २०१८

पहावे :-

१) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ , जळगाव जा. क्र. तापाविम/प्रशा-५/४६४६/सन २०१८ दि. २१/०४/२०१८

२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचेपत्र क्रमांक व्यअस-२०१८/प्र.क्र.४३/अर्थसं-२ दि.१६/०५/२०१८.

**प्रस्तावना :-**

लघु पाटबंधारे तलाव कांग ता. जामनेर , जि. जळगाव, या योजनेस शासन निर्णय क्र. लपात-७८५/१९९४/४५७/८५ ल.पा.-१ दि. ४/११/१९८५ अन्वये रु. २४२.६७ लक्ष इतक्या रकमेस मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर मुळ प्रशासकीय मान्यता व्यपगत झाल्यामुळे सन १९९५-९६ च्या दरसुची नुसार अंदाजपत्रक तयार करून त्यास शासन निर्णय क्र. लपायो १६९५/(२४/९५) खारभुमी मंत्रालय मुंबई दि. ०२/०५/१९९७ अन्वये रु. १०५८.५९ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. त्यानंतर दरम्यानच्या काळात सन २००३-०४ नुसार तापी पाटबंधारे विकास महामंडळ निर्णय क्र. तापाविम/कांस/प्रशा-१/सुप्रमा/लपायो/५९ दि. २०/०९/२००५ अन्वये रु. २६६८.८० लक्ष इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन १९९९-२००० च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, भूसंपादनातील वाढ ,जास्त दराची निविदा स्वीकृती, संकल्पचित्रातील बदल, अंदाजपत्रकातील अपुर्ण तरतुदी ,नविन तरतुदीमूळे , इतर कारणे व तसेच अनुषंगिक खर्च या कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ होत असल्यामुळे योजनेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

## शासन निर्णय -

लघु पाटबंधारे तलाव कांग ता. जामनेर , जि. जळगाव, या योजनेस एकूण अंदाजीत खर्च रुपये ९३.०६ कोटी (त्र्यांणऊ कोटी सहा लक्ष फक्त) या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता सन २०१६-२०१७ च्या दरसूचीनुसार प्रदान करण्यात येत आहे. (कामासाठी एकूण रूपये ८८.३१ कोटी व अनुषंगीक खर्चासाठी रूपये ४.७५ कोटी ). उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

**सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.**

१) सदर प्रकल्पाच्या प्रस्तावित प्रथम सुप्रमात अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

२) या प्रकल्पाबाबत चालु असलेल्या अथवा प्रस्तावित विभागिय चौकशीची कार्यवाही पुढे चालु ठेवावी. सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणा-या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

३) सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंबलबजावणी करण्यात यावी.

४) संपूर्ण प्रकल्प हा प्रस्तावित द्वितीय सुप्रमा किंमतीच्या मर्यादेत पुर्ण करावा.

५) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वित करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहीत आहे असे धरता येणार नाही. सदर सुप्रमा देणेपूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास ही सुप्रमा दिल्याने ती नियमीत झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

६) प्रकल्पाचे काम २ वर्षांमध्ये पूर्ण करून प्रकल्पाचा पुर्णत्व अहवाल शासन मान्यतेसाठी सादर करणेत यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७/ का-१४३४ दि. ०२/०२/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६३/ व्यय-१२ दि. २३/०३/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने व व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक १६ मे, २०१८ रोजी झालेल्या बैठकीत “सदरचा प्रस्ताव ड्रॉप वॉलचा खर्च रु. १०.८५ कोटी वजा करून  मान्य करण्यात आला आहे.” व संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (१९०)  सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (एक) तापी पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत योजना” या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता १८२ अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२२१११३२५७४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.22 11:12:03 +05'30'

**( म.ई.धरणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.

३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगाव
६. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, जळगाव
७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, जळगाव.
९. अधीक्षक अभियंता, जळगाव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगाव
१०. अर्थशाखा १/२, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२. लपा कार्यासन संग्रहार्थ.

## परिशिष्ट

शासन निर्णय क्रमांक : सुप्रमा २०१७/(२२६/२०१७) लपा,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. तारीख: २१ जून, २०१८ चे परिशिष्ट लघु पाटबंधारे तलाव कांग ता. जामनेर , जि. जळगाव उपशिर्षनिहाय तरतूदी

**रू. कोटी मध्ये**

| अ.क्र | तपशिल | प्रथम प्र.मा. | व्दितीय सु.प्र.मा. | वाढीची किंमत |
|---|---|---|---|---|
| अ) | शिर्ष कामे | | | |
| १ | अ- प्राथमिक | ०.०३ | ०.०३ | ०.०० |
| २ | ब- भुसंपादन | १३.०१ | २२.४० | ९.३९ |
| ३ | सी- मुख्य कामे | ९.०० | २८.९३ | १९.९३ |
| ४ | डी- विमोचक | ०.१७ | ०.७० | ०.५३ |
| ५ | के - इमारती | ०.०२ | ०.३९ | ०.३७ |
| ६ | एम- वृक्षारोपण | ०.०१ | ०.०२ | ०.०१ |
| ७ | ओ - संकीर्ण | ०.१५ | ०.५० | ०.३५ |
| ८ | पी - देखभाल | ०.०२ | ०.१० | ०.०८ |
| ९ | आर - दळणवळण | ०.१० | ४.९७ | ४.८७ |
| | **एकुण** | **२२.५१** | **५८.०४** | **३५.५३** |
| ब) | कालवा व वितरण व्यवस्था | | | |
| १ | अ- प्राथमिक | ०.०२ | ०.१४ | ०.१२ |
| २ | ब- भुसंपादन | ०.२४ | ०.२२ | - ०.०२ |
| ३ | डी- विमोचक | ०.०३ | २५.०९ | २४.२५ |
| ४ | इ- प्रपात | ०.०६ | | |
| ५ | एफ- आर. एच.टी. | ०.२० | | |
| ६ | जी- पुल | ०.०१ | | |
| ७ | एल-ओलांडे | ०.०१ | | |
| ८ | एल - मातीकाम | ०.५३ | | |
| ९ | ओ - संकीर्ण | ०.०२ | ०.०० | - ०.०२ |
| १० | पी - देखभाल | ०.०१ | १.१५ | १.१४ |
| ११ | आर - दळणवळण | ०.०४ | ०.०० | -०.०४ |
| १२ | शेतचारी | ०.३० | ३.६७ | ३.३७ |
| | **एकुण कालवा व वितरण व्यवस्था** | **१.४७** | **३०.२७** | **२८.८०** |
| | क अनुषंगिक खर्च | २.७१ | ४.७५ | २.०४ |
| | एकुण | **२६.६९** | **९३.०६** | **६६.३७** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र १०९६ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा ९७७०.४० स.घ.मी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु.१०६३५७/- प्रति स.घ.मी.

ड) लाभव्यय गुणोत्तर १.८५> १

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.22 11:12:15 +05'30'

**( म.ई.धरणे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन